(११) नीचनवे–नीच का नवे. (१३) रूपव्यक्तीची–व्यक्तीयोगरूप (मी माझिया विभूति। विभूति अधिष्ठीलिया व्यक्ति। हे आघवे योग–प्रतीति। एकचि मानुनि असे। म्हणोनि निःशंक पहा योगे। मज मीनले मनाचेनि आंगे। येथ संशय करणें नलगे। तोचि शुद्ध झाला ॥ १०८/९/१०). (१४) विशेष अशा व्यक्ति प्रकृतिचा–व्यक्ति योगरूप झाली असा. (१८) सहादि–सहाही. (२०) आणीक एक तऱ्हेनें त्यास पहा–आणखी विशेषसें असें त्याच्यामध्यें जें कांहीं असतें तें असें की. (२३) कस लाही–कसलाही. (३६८) दैव का संकट अशा तऱ्हेचा देहभावभार जीवी उगवत नाहीं. सहजच जें प्राप्त का स्थिर झालेलें तें स्वभावेंकरूनच भोगावें असें होतें. ३० (३६९) सुखावणें का शिणणें अशी सांडी मांडी ज्याच्या मनानें वर्जिलेली असते ज्यानें असा (पायरीचे चिरे। वरी संत हिरे। पाय देती।) का नुसताच एक साधा दगड असें नच मनावर घेणारा अचल असा.

ओवी ३६७—ज्याच्या मनांत सगळी समता असते. विषयतेला मुळींच वाव नसतो मग कर्म कोठून येणार?

ओवी ३६८—वासना त्याच्या ठायीं नसते, त्यामुळें जें सुख अथवा दुःख येईल तें तो मुकाट्यानें स्वीकारतो.

ओवी ३६९—संकल्प विकल्प सगळे त्यानें सोडलेले असतात, त्यामुळें सुखावणें का शिणणें (निर्बुद्धि जसा तसें) त्याच्या ठायीं नसतें असा जो पुरुष तोच गुणातीत जाणावा.

**पान २६**—(७) आकर्शिलें तेचि हिमवंत जेवि झाले–त्रिगुणसाम्य गुणमयीचें होणें, आईसीचें होणें, आकर्शिलें मूळमायेंत अथवा गुणमयींत परतविले गेले. (९) सोलून टाकून–कला अथवा पदर बाजूला करून. (१५) तत् (ईश्वरत्व) रूप ब्रह्म. (१७) माझें ज्ञान–ज्ञान एक. (२१) ते–ते देह विश्व. (२२) सुवर्णाची टीक स्थिति बोट ठिकाणच की जीवितरूपी सुवर्णास लागली आहे की अहो! असे आणिक ते आपले स्वतःचे सर्वस्वच आहेत असें मानावें. (२४) बुद्धि बोधि–सत्व जीवित प्रेम बोधच संचारला, एक. (२६) पाहा–तैसे अहं मजमाजीं न्याहाळीं = माझ्यामध्यें तूं आहेसच. (३१) आनंद–आनंदित. (३२) ज्ञानयोग–सोहंवृत्ति. विकसीत का आनंदीत दृष्टी, ज्ञानोत्तर भक्ति. ब्रह्म भूः. (३५) योग–योग होय.

**पान २७**—(३) विहिरीचा–विहिरीचें तोंड आकाशाच्या दांडयानें सांदलें आहे कां जोडलें नव्हे, तेथें समरसताच एक सर्व. (१०) पुरुषार्थ–मोक्ष. (१९) ब्रह्मत्व–अभिप्राय ईश्वरत्व. (३४) (४१३) मथळा–मागणें–भरतवाक्य. **पान २८**—तुम्हांस–तुम्हांस आपल्या सर्वस्वाच्या ठायीं. (६) आपल्या–आपल्या सर्वस्वाच्या.

---

हें पुस्तक वि. दा. लिमये, यांनीं इंडिया प्रिंटिंग वर्क्स, ९ बेकहाउस लेन, फोर्ट, मुंबई, येथें छापिलें व तेथेंच प्रकाशित केलें.

# संत वचनें—संत दर्शन

१. प्रगटले ज्ञान । नारायण मूर्ती तें ॥ १ ॥
अनुभवचि घेवो हांवा । विनंती देवा करूनिया ॥ २ ॥
देखो वेखी वदे वाणी । पडिलिया कानीं प्रमाण ॥ ३ ॥
तुका म्हणे योग क्षेम । घडे ते वर्म साधावे ॥ ४ ॥

२. जें जें जेथें पावे । तें तें समर्पावें सेवें ॥ १ ॥
सहज पूजा याचि नांवे । गळित अभिमान व्हावे ॥ २ ॥
अवघें भोगितां गोसावी । आदि अवसानि जीवि ॥ ३ ॥
तुका म्हणे शीण । न धरितां नव्हें भिन्न ॥ ४ ॥

३. आहे ऐसा देव वदवावी वाणी । नाहीं ऐसा मनि अनुभवावा ॥ १ ॥
आवडी आवडी कलेवरा कलेवरी । वरिले अंतरी ताळा पडे ॥ २ ॥
अपूर्व दर्शन माते पुत्रा भेटीं । रडे मागे तुटी हर्षे योगे ॥ ३ ॥
तुका म्हणे एके कळते दुसरे । बरियानें बरे आहाचे आहाच ॥ ४ ॥

४. भक्ति ते नमन वैराग्य तो त्याग । ज्ञान ब्रह्मी भोग ब्रह्मतनु ॥ १ ॥
देहाच्या निरसनें पाविजे या ठाया । माझी ऐसी काया जंव नव्हे ॥ २ ॥
उदक अग्नि धान्य झाल्या घडे पाक । एकाविण एक कामा नये ॥ ३ ॥
तुका म्हणे मज कळते चांचणी । बडबडीची वाणी अथवा सत्य ॥ ४ ॥

५. तेहि नव्हे जे करितां कांही । ध्याता ध्याई तेही नव्हे ॥ १ ॥
तेहि नव्हे जे जाणवी जना । वाटे मना तेही नव्हे ॥ २ ॥
त्रास मानिजे कांटाळा । अशुभ वाचाळा तेहि नव्हे ॥ ३ ॥
तेहि नव्हें जे भोंवती भोंवे । नागवे धांवे तेहि नव्हे ॥ ४ ॥
तुका म्हणे एकचि आहे । सहजीं पाहे सहज ॥ ५ ॥

६. संतभेटती आजि मज । तेणे झालो चतुर्भुज ।
दोन्ही भुजा स्थूळीं सहज । दोनि सूक्ष्मी वाढल्या ॥ १ ॥
आलिंगनें सुख वाटे । प्रेमें चिदानंद गोठे ।
हर्षे ब्रह्मांड उतटे । समूळ देह मीपण ॥ धृ० ॥
या संतासी भेटतां । तुरे संसाराची व्यथा ।
पुढती पुढती माथा । अखंडित ठेवीन ॥ २ ॥
या संतांचें देणें । कल्पतरूहुनि दुणें ।
परिसा परिस अगाध देणें । चिंतामणी ठेंगणा ॥ ३ ॥
या संता परिस उदार । त्रिभुवनी नाहीं थोर ।
मायबाप सहोदर । इष्ट मित्र सोयरे ॥ ४ ॥
कृपा कटाक्षे न्याहाळिले । आपुल्या पदीं बैसविले ।
बापरखुमादेवीवरे विठ्ठले । भक्ता दिधले वरदान ॥ ५ ॥

आज मला संत भेटले; त्यामुळें मी चतुर्भज झालों. दोन भुजा स्थूळ आहेतच; आनंदाच्या आणखी दोन सूक्ष्म वाढल्या. संतांना आलिंगन देतांना अतिशय सुख वाटतें. त्यांच्या ठिकाणीं असलेलें प्रेम चिदानंदरूप होतें. आनंद तर ब्रह्मांडाबाहेर जातो. आणि शरीरावरचा अहंभाव समूळ नाहिंसा होतो. ह्या संतांच्या भेटींत संसाराची व्यथा नाह्शिी होते. त्यांच्या चरणांवर मी वारंवार मस्तक ठेवीन; ह्या संतांचें दान कल्पतरूपेक्षां जास्त आहे. परिसापेक्षांही अधिक आहे. चिंतामणी तर त्याच्या दानापुढें अगदीं ठेंगणा आहे; आईबाप, सहोदर किंवा इष्टमित्र यांच्या पेक्षांही जास्त कल्याण करणारे संत आहेत. फार काय सांगावें त्रिभुवनांतही संतांच्या इतकें मूर्तिमंत औदार्य कोणी जाहलें नाहीं. ते ज्या ज्या (ज्याच्या) कडे कृपादृष्टीनें पाहातात त्याला आपल्या योग्यतेला आणून बसवितात. याप्रमाणें रखुमादेवीवर बाप जो श्रीविठ्ठल त्यानें आपल्या भक्ताला वरदान दिलें. (देवाची आळंदी ज्ञा. गा.)

## आकार स्थूल जात—

ओवी २१८ (१४)

'अवघियाची दैवा जन्मभूमि हे सेवा—'

४३१ (१३) 'मग देहांति नवल बुद्धि वाहे'

७. आकार स्थूल नाशिवंत। हे तरि जाईल भूमि आंत।
तयावरि हरि चालत। तेणे होईल कृतकृत्य ॥ १ ॥
देह जावो अथवा राहो। पांडुरंगी दृढ भावो ॥ ध्रु०॥

दुजा गुण आपी मिळे। तरि मी होईन गंगाजळ।
हरि अभिषेक अनुदिनी। सुखे सर्वांगावरि खेळे ॥ २ ॥

तिजा गुण तेजरूप। तरि मी होईन महादीप।
हरि रंगणी दीपमाळा दीप। उजळीन समीप ॥ ३ ॥

वायु व्यापक चौथा गुण। तरि विंजणा होईन।
हरि अष्टांगें निववीन। ऐशा दृढ धरिन खुणा ॥ ४ ॥

आकाश पांचवा गुण। तरि मी प्रासादीं राहीन।
बाप रखुमादेवीवरा। अखंड तुझे अनुसंधान ॥ ५ ॥

अर्थः—भगवत् उपासकाची देहत्यागानंतरची भगवत् उपासनेविषयीं किती निष्ठा असते तें ह्या अभंगांत दाखवितात. स्थूल शरीराचा आकार नाशवंत असल्यामुळें तो केव्हांतरी भूमींत जाणार-तो अशा भूमींत मी घालीन कीं त्यावरून भगवान् श्रीहरी चालतील; त्यामुळें मी कृतकृत्य होईन. माझा हा देह जावो किंवा राहो पांडुरंगाचे ठिकाणीं माझा अत्यंत दृढ भाव आहे. शरीरांतील दुसरा गुण पाणी हा आहे. तें पाणी मी गंगाजळांत मिळवीन; त्याचा भगवंतांना रात्रंदिवस अभिषेक होईल, त्यामुळें सुखाने मी हरीच्या सर्वांगावर खेळेन. तिसरा गुण तेजरूप आहे तो मी महातेजांत मिळवून मी हरीच्या अगणांत दीपमाळ होऊन हरीजवळ दीप उजळीन. चवथा गुण सर्वत्र व्यापक वायू तो मी पंख्यांत शिरून त्याने हरीची अष्टागें निववीन. असा दृढ हेतू माझ्या मनांत आहे. आतां आकाश पांचवा गुण आहे तो मी प्रासादीं म्हणजे मंदिरांत आकाश होऊन राहीन; रखुमादेवीच्या वरा बापा श्रीविठ्ठला याप्रमाणें मी तुमचें अखंड अनुसंधान करीन असें श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात. (देवाची आळंदी ज्ञा. गा.)

**पान १३**—इवेचा दिसे—अथी २९

८. मंगल मूर्ती तूं की मनाचिया लावण्यबाणा । वेधी वेधक तू सहजगुणा ।
सगुण निर्गुण न कळे तुझे विंदान कैसे । आपचि घर दाटुन रिगसी ।
तेथे नवलाव वर्णूं काय । कोणा रया ॥ १ ॥

वर्णिता तुझे गुण । मना मौन पडे ।
कळिकाळ बापुडे । काय करील आम्हां ॥ ध्रु० ॥
ध्यानमूर्ती तुझी मनें अलंकारली । मना माझारी संसरली ।
संचरता इंद्रियें सुमन पदी । तुजविण न दिसे आन बोली ।
तेथे भिन्न भिन्नपणे कोणा पाहो दातारा । दिठी सुखाचेनि सुखे स्थिरावली रया ॥ २ ॥

बाप रखुमादेवी वर विठ्ठले । की आनंदाचे वोळले ठेले ।
ओतप्रोत सघन । नावेक नुरे काही एक केले ।
तुझे तुज गान्हाणे । किती देऊ दातारा ।
बोलविता भले नव्हे रया ॥ ३ ॥

अर्थः—हे श्रीहरीकृष्णा ! काय तुझी मूर्ती मंगलरूप आहे ! तुझ्या मुखावरील लावण्यरूप बाणानें माझ्या मनाचा वेध केला आहे. सहज स्वरूप स्थितीचें बोधक तूंच आहेस–तुझ्या स्वरूपाचा निर्धार करूं गेलें असतां तूं सगुण आहेस कीं निर्गुण आहेस याचा कांहीं पत्ता लागत नाहीं. तेव्हां तूं अमूकच आहेस असा कसा निश्चय करावा ? आपण स्वतः सृष्टी निर्माण करून त्यांत बळेंच आपण प्रवेश करतोस. हा तुझ्या कृतीचा चमत्कार कोणी वर्णन करावा ? तुझें गुणवर्णन करूं गेलें असतां मन तुझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं तटस्थ होतें मग तेथें गरीब बिचारा काळ आम्हाला काय करील ? म्हणजे आमचा नाश कसा बरें करील ? तर (तो) आमचा नाश करणार नाहीं. अशी तुझी मूर्ती मनांत अलंकृत केली असतां त्या मनांत तुझा आपोआपच प्रवेश होतो. तसा प्रवेश झाला म्हणजे मन तर भगवंतरूप होतें–तशीं इंद्रियेंही मनाप्रमाणें होतात. मग तुझ्या स्वरूपावाचून दुसरें दिसत नाहीं. म्हणून बोलतांही येत नाहीं–अशा ऐक्य स्थितींत मनाचा उपरम झाला असतां त्या ठिकाणीं भिन्नभावानें कोणास पहात बसूं ? कारण तुझ्या स्वरूपसुखामध्यें मनाची दृष्टी सुखामध्यें स्थिर झालेली असते–रखुमादेवीचा वर जो बाप श्रीविठ्ठल हा आनंद स्वरूपानें मनांत येऊन राहिल्यामुळें ओतप्रोत घनानंद मूर्तीशिवाय यत्किंचित् सुद्धां करण्याला कांहीं शिल्लक रहात नाहीं. हें तुझ्या स्वरूपाचें वर्णन हे श्रीहरी तुझ्यापुढें किती करूं ? तेव्हां तुझ्याविषयीं कांहीं वर्णन न करणें हेंच चांगलें असें श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात. (देवाची आळंदी ज्ञा. गा.)

---

